प्रकाशक :

प्रा. वि. पां. देऊळगांवकर
अध्यक्ष, मराठी साहित्यमंडळ,
स्टेशनबाजार, गुलबर्गा - २.



प्रकाशन क्रमांक १
आवृत्ती पहिली
१९७५



मूल्य पाच रुपये



मुद्रक :

कुमुदचंद्र फुलचंद शाह
मे. सन्मति मुद्रणालय,
१६६, शुक्रवार पेठ,
सोलापूर, ४१३००२



आत्मीयतेने
घडविले
ज्यांनी
मला
त्या
पूज्य
गुरुजनांना
सा द र
समर्पण !



# प्रस्तावना

'गंधवती' हा कवितासंग्रह 'दवना'च आहे की काय ? माझ्याकडे येऊन ५–६ महिने झाले. त्याचा सुगंध शावूत आहे. प्रिय मित्र श्री. देऊळगावकरांनी, श्री. डी. के. पुजारी यांच्या हस्ते लिखाण पाठविले. गुलवर्ग्याला जाताना प्रास्ताविक लिखाण न्यावे अशा विचाराने, जाणे पुढे पडत गेले आणि कामही राहिले. जाणे जमले नाही तरी लिहिणे आता जमले. हा कवितासंग्रह वाचून मी सुखावलो आहे. कवितेत हार्दिक सुखाशिवाय दुसरे काय मिळणार ? पण जेव्हा खास कवीची भेट होईल, तोही दिवस मंगलकर असे मी समजेन.

१९४८ ते १९७५ या काळात कवी चंद्रशेखर कपाळे हे कसे जिवंत व रसरशीतपणे जगत होते, जागे होते याची ही एक साक्ष आहे. प्रत्येक कवीचे स्वतःच्या प्रेमाचे म्हणून काही गाणे, गाऱ्हाणे असतेच. प्रत्येक वृक्षाला पालवीची तऱ्हा अलग आणि आगळीच असते. त्या प्रेमात नुसती हळहळ अथवा हळवेपणा नसतो. जिवंत हाकेला जिवंत असे उत्तर घनीभूत होत गेले आहे. मग राहिले बाहेरचे जग. मीही त्या काळी सोलापुरात होतो. नंतर धारवाडास आजतागायत आहे. चंद्रशेखर कपाळे यांची पहिली कविता सोलापूरची आहे. बऱ्याच कविता मराठवाड्यात लिहिलेल्या आहेत. काही कविता बेंगळूर–म्हैसूरकडच्या प्रवासातही लिहिलेल्या आहेत.

कवीला देश आणि भाषा यांची मर्यादा असतेच असे काही नव्हे. पण त्याच्या हृदयात त्याचे जन म्हणून कोणी वास करीतच असतात. कवीमनाची, जनमनाची ही देवाण घेवाण सहजासहजी होते. त्यातच कविता येतात. सारी कविता मुळात संयमी आहे. वेगळ्या शैलीचा उतावळा आविर्भाव नाही. कवीसारखा कवी. पण ज्याच त्याच सत्त्व काही निराळ असत. तशी माझी व श्री. कपाळे यांची ओळख बिलकुल नाही. ते एका रीतीने वरे झाले. परंतु एका गोष्टीत मात्र माझ्या हृदयाला बिलगतात, ते म्हणजे दिवंगत शंकरराव आळंदकर–चित्रकार, चिंतक, तपस्वी, अंतस्तृप्त.

या संग्रहात एक दीर्घ कविता त्यांच्याविषयी आहे. माझ्या पन्नाशी, साठी, सत्तरी या तिन्ही प्रसंगी शंकररावांनी तीन चित्रे मला अर्पण केली. ती आता अखिल कर्नाटकाला मी अर्पण केलीच आहेत. त्यांच्या रविंद्र चित्रावली निमित्ताने मी कन्नडमध्ये काही कविता, वचनावली लिहिली. तीही कर्नाटकाला अर्पण झालीच आहे. कवी कपाळे स्वतः चित्रकारही आहेत असे मला कळते. छायाचित्रकार, कलाभिज्ञ, व्यासंगी व रसिक आहेत असे माझे मित्र सांगतात. 'गंधवती' संग्रहात हातचे रंग राखून ठेवून गंधालाच बहुमान्यता दिली आहे हेच बरे झाले.

गंध हा पृथ्वीचा गुण आहे. चंद्रशेखरांच्या कवितेला गंधाने चांगलेच माखले आहे. भरघोस गंध आहे. काही एकांतातला आहे, काही लोकांतातला आहे. नसत्या संतपणापेक्षा जिवंत संथपणा कवीच्या शब्दार्थाशी एकरूप झालेला आहे. त्यामुळे ते चुटकेच लिहोत अथवा दीर्घ काव्य करोत त्याचा संथप्रवाह 'खडका'लाही जुमानत नाही. स्वातंत्र्यापूर्वीच्या भावना त्यांच्यात तुरळक राहिल्या तरी त्यांचे काव्य बहुधा स्वातंत्र्योत्तर काळाचे आहे. गांधी, जवाहरलाल नेहरु, लाल बहादूर, स्वतंत्र बंगालचा रणरंग, गांधी शतमानोत्सव या सर्व प्रसंगांना त्यांनी आपला मुजरा अर्पण केलाच आहे.

प्रणय चित्रणात ते आपले असे काही नाणे टाकसाळेत पाडतात. धागा जुळणे, तुटणे, उसवणे, रेशमी नाते, मुक्याने पाहणे, हे सारे सहज आहे. पण आपली अहंता दिव्यत्वात विरावी अशी एक ओढ येथे आहे.

" अपूर्णांकी मीलनात
गर्भ धरी ब्रह्मानंद "

ब्रह्मानंदी टाळी हे जुने पालुपद आहे. पण त्यांच्या मनाच्या मांजराचे उबेत गुरगुरणे मजेदार आहे ! लज्जत आहे ! प्रेमात काय, देशात काय ? जिथे तिथे कसल्या तरी भिंती असतात. त्या भिंती नडतात कवीला. 'Narrow domestic Walls' बद्दल गुरुदेव रविंद्रनाथ टागोर देखील गुरगुरले होतेच. काही असो, खोल झऱ्याचे हळवे पाणी आहे ते आहेच.

संतांची आठवण कवीला वरचेवर होते. हे असहज नाही. सारे खरे. दुरितांचे तिमिर जाता जात नाही. पण कवीला श्रद्धा आहे की तिमिर एकदा जाणार म्हणून.

काव्यात गोडवा असणे हे अपेक्षणीयच आहे. पण चंद्रशेखरांचा तिखटपणा ढंग–बिंग न करता जेव्हा चटका देतो तेव्हा सहृदय माणसालाही बरे वाटते. का तर तो नटवेपणा नसतो. सूर्य आज विझला तरी 'मातीचे सुंदर मूल–सूगंधी फूल' हे कसे विसरेल ? लालबहादूर देवदूतासारखा उडून गेला– कवीच्या दृष्टीतून. 'याह्यासूर–मातला–गौरी बनली काली माता' हे ज्यानी अनुभवले त्या कवीला भारत गीत गाताना धन्यता कशी वाटणार नाही ? भिंती जरी असल्या तरी 'सीमोल्लंघन' चालू आहेच. हो आहे.

"घडले हे सारे
पाहिले आम्ही
तटस्थतेने
– हे एक सत्य"   हे खोटे का ?

'एक आनंदयात्री'– हे शंकरराव आळंदकर गुरुजी. माझेही कवीशी सहमत आहे. त्यानंतर येणारी 'निवृत्तीतील कर्मयोग' ही कविता. पूर्वीच्या कवितेला पूरक अशीच आहे. स्वातंत्र्याची पंचविशी काय ! गांधीजींची शताब्दी काय ! त्यात काही गोड काही कडू असणारच.

चंद्रशेखर यांची 'खडक', 'फिनिक्स', 'वस्त्रहरण' 'अगा कधी जे' या काही कवितात दुर्दम्यतेवरोवर 'संयम'ही आहे. त्यात कवीचा टणकपणा आहे. पक्वता म्हणजे मऊमऊपणा नव्हे. 'गंधवती'चे सुस्वागत रसिक सहृदय करतीलच. या कवीची नवनवी कविता येत राहो – राहील ही माझी अपेक्षा आहे.

– द. रा. बेन्द्रे

# प्रकाशकाचे मनोगत....

माझे स्नेही व सहकारी प्रा. श्री. चंद्रशेखर कपाळे यांच्या कवितांचा हा पहिला संग्रह गुलबर्गा येथील मराठी साहित्य मंडळाच्या वतीने प्रकाशित होत आहे ही मोठी आनंदाची व शुभसूचक अशी घटना आहे. श्री. कपाळे यांचा हा पहिलाच संग्रह रसिकांपुढे येत आहे. तसेच मराठी साहित्य मंडळाच्या वतीने होणारेही हे पहिलेच प्रकाशन आहे. जीवनातल्या सर्वच पहिल्या–वहिल्या गोष्टी अभिनंदनीय असतात; कौतुकार्ह वाटतात. कुटुंबातील पहिले अपत्य माता-पित्यांचेच नव्हे तर शेजाऱ्या-पाजाऱ्यांचे, येणाऱ्या-जाणाऱ्यांचे, कुतुहलाचे, लोभाचे, प्रीतीचे विषय बनते. त्याचप्रमाणे आपली प्रकाशित होणारी पहिली कृती म्हणून श्री. कपाळे यांना व नव्या क्षेत्रातील आपले पहिले पाऊल म्हणून मंडळाला, दोघांनाही एक प्रकारच्या सात्त्विक सुख समाधानाचा प्रत्यय येणे साहजिक आहे.

मराठी साहित्य मंडळासारख्या साहित्य संस्थांचे कार्यक्षेत्र तसे खूपच व्यापक आहे. त्यात साहित्य निर्मितीस प्रोत्साहन देण्यास जितके महत्त्वाचे स्थान आहे तितकेच साहित्य प्रकाशनाला व वाचक वर्गापर्यंत ते पोहोचविण्यालाही. या ना त्या कारणामुळे आतापर्यंत मंडळाकडून ते कार्य झाले नाही, याची रुखरुख मात्र लागून होती. ती आज ' गंधवती ' मुळे दूर होत आहे याचा कुणाला बरे आनंद वाटणार नाही ?

कोणत्याही कार्याचा शुभारंभ म्हणजे त्या कार्याच्या यशस्वितेची अर्धी हमीच असे म्हटले जाते. त्या दृष्टीने ' गंधवती ' ने कविवर्य पद्मश्री डॉ. द. रा. बेंद्रे यांच्यासारख्या मान्यवर तपस्व्यांचा आशीर्वाद प्राप्त करून घेऊन आमच्या प्रकाशन कार्याचा आरंभ तर उत्साहजनक असा केला आहे. त्यामुळे कवीच्या भावी उज्ज्वल यशाची, त्याचप्रमाणे प्रकाशन क्षेत्रातील मंडळाच्या पुढील प्रगतीची ' गंधवती ' नांदी ठरेल अशी आशा बाळगण्यास हरकत नाही.

गंधवतीचा मार्मिक परिचय गुरुवर्य वेंद्रे यांनी करून दिलाच आहे. गंधवतीचा सुगंध महाराष्ट्र सारस्वत क्षेत्रात दरवळू लागण्यास फार वेळ लागणार नाही अशी आशा त्यानी व्यक्त केली आहे. आपला वरदहस्त कवीच्या व पर्यायाने आमच्या शिरावर ठेवल्याबद्दल गुरुवर्यांच्या चरणी कृतज्ञता अर्पण करणे मंडळाचा अध्यक्ष या नात्याने माझे कर्तव्यच ठरते. तेच पार पाडण्यासाठी मला हे मनोगत लिहिणे क्रमप्राप्त झाले.

काव्य क्षेत्रात अप्रतिहत संचार करण्याची इच्छा बाळगणाऱ्या नव्या उमेदीच्या कवींनी गुरुवर्यांच्यासारख्या व्यक्तीकडून आशीर्वाद पाथेय लाभावे अशी आशा करणे साहजिक आहे. हा आशीर्वाद मागायचा म्हणजे त्यांची भेट घेऊन त्यांना कविता वाचून दाखवायच्या. अर्थात त्यांचा अमूल्य वेळ घ्यायचा. या साऱ्या गोष्टी ओघानेच आल्या. इतक्या मोठ्या व्यक्तीचा वेळ आपल्या स्वार्थासाठी घ्यावा किंवा नाही याबद्दल माझ्या मनात नेहमीच संभ्रम उत्पन्न होत असतो. पण का कुणास ठाऊक माझा कुठलाही अधिकार नसता, अंगी कुठली पात्रता नसता गेल्या दहा, पंधरा वर्षापासून गुरुवर्यांच्या घरी जाऊन त्यांचा वेळ घेण्याचे पातक माझ्या हातून घडत आले आहे. 'कळते पण वळत नाही' अशी त्याबाबतीत माझी स्थिती झाली आहे. नुसते पाच मिनिटे जाऊन त्यांची भेट घेऊन परत यावयाचा विचार करुन गेलेल्या मला त्यांच्या घरातून परतायला तास, पाऊण तास सहज लागे. कारण तेथे गेलो म्हणजे मला त्यांचा निरोप घ्यायचे भानच राहात नाही. एवढ्या जवळिकेच्या आधारावर श्री. कपाळे यांच्या काव्य-संग्रहाला गुरुवर्य वेंद्रे यांची प्रस्तावना मिळवून देण्याची अवघड कामगिरी मी माझ्याकडे घेतली. कोणत्याही लहान-सहान कामाच्या बाबतीतसुद्धा इतक्या आत्मविश्वासाने मी कुणाला आश्वासन देत नसतो. पण त्यांच्याविषयी असलेल्या जवळिकीने हे आश्वासन मात्र मी दिले. मग त्या तयारीला लागलो. तो आशीर्वाद मिळविण्यासाठी श्री. कपाळे यांनाच त्यांच्या संग्रहासह धारवाडला जाऊन गुरुवर्यांची भेट घेण्यास सांगितले. मी श्री. कपाळे यांचा परिचय करून देणारे एक पत्र मात्र सोबत दिले. श्री. कपाळे यांनी गुरुवर्यांना पाहिले होते. प्रत्यक्ष परिचय असा नव्हता. पण

मी श्री. कपाळे यांना सांगितले की, प्रत्यक्ष परिचय नसल्याची अडचण गुरुवर्यांशी बोलताना तुम्हाला कधीच भासणार नाही. एक तर तुम्ही दोघे समानहृदयी आहात, अन् दुसरी गोष्ट अशी की गुरुवर्यांच्या सान्निध्यात औपचारिकतेची सारी बंधने गळून पडतात व आपल्यासमोर असलेल्या व्यक्तीशी कित्येक वर्षांच्या घरोब्याच्या माणसाशी बोलावे तसे ते बोलत राहातात, आणि आपले हृद्गत व्यक्त करण्यात त्यांचा किती वेळ जातो याचे त्यांना भानही राहात नाही. एवढ्या आधारावर श्री. कपाळे आपला संग्रह घेऊन धारवाडला त्यांच्या घरी गेले. पण कर्मधर्मसंयोगाने त्या दिवशी गुरुवर्यांची भेट झाली नाही. योग नव्हता असेच म्हटले पाहिजे. मग तो संग्रह तेथेच ठेवून गुरुवर्यांच्या सवडीनुसार त्यांच्याकडून प्रस्तावना लिहून घेण्याचे काम धारवाडला पीएच. डी. च्या अभ्यासासाठी राहात असलेले आमचे मित्र श्री. दत्तोपंत पुजारी यांच्यावर सोपविले. श्री. पुजारी यांनी ही कामगिरी, आपल्यामागे कामाचा व्याप असूनही अत्यंत चोखरीतीने पार पाडली. त्यांच्या खटपटीमुळे, चिकाटीमुळे गुरुवर्यांनी या संग्रहाला रसास्वादात्मक प्रस्तावना लिहून आपण स्वतःच माझ्याकडे पाठवून दिली. त्याबरोबर एक भावपूर्ण पत्रही होतेच. ज्या दिवशी ते पत्र व प्रस्तावना हाती पडली त्यावेळी आम्हाला धन्यता वाटली. आमचे मनोरथ पूर्ण झाल्याचे समाधान झाले. अपेक्षेप्रमाणे चांगली प्रोत्साहक प्रस्तावना आली.

श्री. कपाळे यांना कविवर्यांच्याकडे पाठविताना गुलबर्ग्याचा हा मराठी कवि कविवर्यांवर आपल्या वैशिष्ट्यपूर्ण काव्याने निश्चित प्रभाव पाडील या आत्मविश्वासाने मी प्रेरित झालो होतो. श्री. कपाळे यांच्यामधील कवीलाही मी अगदी जवळून ओळखत असल्यामुळे दोन कवींची भेट घडवून आणावी ही माझी इच्छा होती. प्रत्यक्ष भेट झाली नाही तरी कविवर्यांना या कवि-मनाचा परिचय होण्यात काहीच बाधा आली नाही. उलट कविवर्यांनी म्हटल्याप्रमाणे पूर्वपरिचय नाही हेच एका दृष्टीने बरे झाले. कारण त्यामुळे काव्याचे मूल्यांकन अधिक वस्तुनिष्ठपणे होऊ शकते.

श्री. कपाळे यांच्या काव्यप्रतिभेचा आलेला प्रत्यय कविवर्यांनी अगदी मोजक्या व सूचक शब्दात व्यक्त केला आहे. त्यांच्याबद्दलच्या आशाही

व्यक्त केल्या आहेत. त्या आशा सफल झाल्याचा निर्वाळा रसिक देतील असा मला विश्वास वाटतो.

श्री. कपाळे यौवनसहज एक छंद म्हणून काव्याच्या मागे लागलेले केवळ शब्दजुळारी नव्हेत. जातिवंत कवीच्या ठिकाणी असणाऱ्या भावनेची उत्कटता त्यांच्या ओळीओळीतून दिसून येते. एखाद्या वायुभारदर्शक यंत्राप्रमाणे ( Barometer ) या कवीचे मन संवेदनाक्षम (Sensetive) आणि हळुवार आहे. या वृत्तीतूनच त्यांची वरीचशी कविता स्फुरली आहे. सत्य, शिव, सुंदराचे ते पुजारी आहेत. त्यांचा त्याना ध्यास लागलेला आहे. त्याच्या प्राप्तीस्तव ते निरंतरचे यात्रिक बनू इच्छितात. त्याना ती वाट सरूच नये असे वाटते. म्हणून ते म्हणतात–

'नको सरायास वाट'
ही अशीच निरंतर
युगे युगे राहावीच
पुढती पुढती जात।
तृप्तीतही अतृप्तच
मन भ्रमावे शोधीत
मधुमानवता रस
चिरकालाच्या पुष्पात ॥

मानवतेचा निस्सीम उपासक असलेल्या कवीच्या मनाचा सभोवतालच्या प्रतिकूल, प्रतिगामी, सामाजिक, आर्थिक परिस्थितीने कोंडमारा होतो. म्हणून व्याकुळतेने कवी पुढील उद्गार काढतो–

स्वातंत्र्य बंदिस्त चिऱ्याआड
अडतेच आहे, दडतेच आहे
रडतेच आहे, मानवता
भिंती भिंती आड

पण या सर्व कोंडमाऱ्यामुळे हे कवीमन विफलतेने मात्र ग्रासले गेले नाही, उलट ते उद्याची रम्य स्वप्ने पाहाते.

‘ दिक्कालाच्या अतीत होउन
व्यापुन विश्व उरावे
मी पण माझे सोऽहंतेच्या
दिव्यत्वात उरावे ’

ही कवीची इच्छा आहे. स्थूल मानाने मर्ढेकरादी कवींनी मराठीत नवकाव्याला आरंभ केल्यानंतर श्री. कपाळे यांनी आपल्या काव्य–लेखनाला आरंभ केलेला दिसतो. अर्थात काव्याच्या नव्या प्रकाराचे आकर्षण त्या काळातील उदयोन्मुख कवीप्रमाणे यांनाही वाटणे साहजिकच होते. पण या नव्या तंत्राचे यांनी कुठेच अंधानुकरण केले नाही. नवकाव्याच्या तथाकथित लक्षणांच्या ते आहारी गेले नाहीत. न कुठे हिणकस प्रतिमा ( Deliased images ), न कुठे दुर्बोधता, न कुठे नैराश्येने ऊर बडवीत बसण्याचा अट्टाहास. त्या दृष्टीने त्यांची कविता नवी असूनही जुनीच म्हणावी लागेल. आशय घन असूनही सुबोध अन् सरळ. मुक्तछंद असूनही लयबद्ध व कर्णमधुर शब्दरचनेमुळे ती वाचताना एक प्रकारची आगळीच गोडी वाटते.

त्यांच्या अभिव्यक्तीत कुठे अनाठायी आवेश नाही. उलट विलक्षण संयम आहे; मग ती प्रीतिकविता असो की सामाजिक आशयाची. उत्तानतेला कुठेच थारा नाही. इतके असूनही एक प्रकारची प्रेरक शक्ती ( Poetic momentum ) त्यांच्या काव्यात निश्चित आढळते. अशा कवितांचा संग्रह प्रकाशित करण्याचा योग जुळून आला याबद्दल मंडळाला विशेष आनंद होत आहे. तो जुळवून आणण्यात अनेकांचे हातभार लागले आहेत. त्या सर्वांचे मनःपूर्वक आभार. गु. डॉ. द. रा. बेंद्रे यांनी अगदी वेळेवर आपला आशीर्वाद पाठवून मंडळाच्या कार्यास सक्रिय प्रोत्साहन दिले. याबद्दल मंडळ व मी स्वतः त्यांचा सदैव ऋणी आहे. गुरुवर्यांचे चिरंजीव श्री. डॉ. वा. द. बेंद्रे यांनीही आमच्या कामासाठी बरेच कष्ट घेतले. त्यांना आमचे हार्दिक धन्यवाद. श्री. द. कृ. पुजारी हे तर मंडळाचेच प्रतिनिधी म्हणून धारवाडला आहेत असे आम्ही समजतो. त्यामुळे त्यांचे आभार मानणे हे त्यांना मानवणार नाही म्हणून त्यांच्या अंगीकृत कार्यात त्याना सुयश लाभून त्यांचा

उत्तरोत्तर उत्कर्ष होवो ही सदिच्छा व्यक्त करतो. सन्मति मुद्रणालयाचे संचालक श्री. कुमुदचंद्र फुलचंद शहा यांनी मोठ्या दक्षतेने या संग्रहाचे सुबक मुद्रण करून दिल्याबद्दल मंडळ त्यांचे आभारी आहे. या प्रकाशनाच्या कामात अगदी पहिल्यापासून आमचे मार्गदर्शन करीत असलेली व्यक्ती म्हणजे सोलापूरचे कवी श्री. कुमार कोठावळे. मंडळावर त्यांचा विशेष लोभ आहे. आमच्या प्रगतीची त्यांनाही तळमळ आहे. त्यांच्या आपुलकीबद्दल कृतज्ञ आहोत.

या प्रकाशनाचे रसिकांकडून सहर्ष स्वागत होऊन आमच्या पुढील कार्याला भरीव उत्तेजन मिळो ही आशा !

वि. पां. देऊळगावकर
अध्यक्ष,
म. सा. मंडळ, गुलबर्गा.

गुलबर्गा
दि. २०-११-७५.

## कृतज्ञता—

'गंधवती' हा माझा पहिलाच कवितासंग्रह. १९४८ ते १९७५ या अठ्ठावीस वर्षांच्या दीर्घ कालावधीतील काही कविता ह्यात आहेत. त्यापैकी काही 'प्रतिष्ठान', 'मराठवाडा', 'नवभारत' व महाविद्यालयीन नियत-कालिकातून प्रसिद्ध झाल्या आहेत. बऱ्याच कविता गहाळही झाल्या असाव्यात. स्नेह्यांच्या प्रेमळ आग्रहास्तव संग्रहरूपाने या प्रथमच प्रकाशात येत आहेत.

माझ्या कवितेची भलावण मी करणार नाही. तिचे भलेबुरेपण रसिक ठरवतील. पद्मश्री डॉ. द. रा. बेंद्रे यांनी प्रस्तावना रूपाने आशीर्वाद दिला आहे. त्यांनी केलेल्या कौतुकाने मला आनंद तर झालाच पण त्यामुळे माझा उत्साहही वाढला आहे. मी त्यांचा सदैव कृतज्ञ राहीन.

ज्येष्ठ बंधुतुल्य प्रा. वि. पां. देऊळगावकर यांनी म. सा. मंडळाचे अध्यक्ष या नात्याने जे 'मनोगत' व्यक्त केले आहे ते सारे माझ्या-विषयीच्या जिव्हाळ्यातूनच. त्यांनी व म. सा. मंडळाच्या कार्यकारिणीने हा काव्यसंग्रह मंडळाच्यावतीने प्रकाशित करण्याची तत्परता दाखविली याबद्दल मी त्यांचा चिरऋणी आहे.

प्रस्तावना— संपादनाच्या बाबतीत प्रा. वि. पां. देऊळगावकराप्रमाणेच धारवाडचे डॉ. वा. द. बेंद्रे व श्री. द. कृ. पुजारी यांनीही अमोल सहाय्य केले. त्यांचाही मी आभारी आहे.

सोलापूरचे कवी मित्रवर्य कुमार कोठावळे यांनी तर काव्यसंग्रह अवश्य प्रकाशित करावा या कल्पनेपासून तो संग्रहाची छपाई—प्रूफ तपासणी—संग्रहाचे नामकरण—मुखपृष्ठ तयार करविणे इत्यादि सर्वच कामे मोठ्या आत्मीयतेने पार पाडली. त्यांचा हा स्नेहभाव मी सदैव अंतःकरणात वागवीन—जागवीन.

'रंगरेखा' चे कलावंत श्री. चव्हाण यांनी 'गंधवती' चित्रित करून तिला सुंदर रूप दिले. या सौंदर्यदानात सन्मति प्रेसचे श्री. कुमुदचंद्र शहा व त्यांच्या सहकाऱ्यांचाही मोठा हात आहे. त्या सर्वांचे आभार मानणे मी माझे कर्तव्य समजतो.

— चंद्रशेखर कपाळे

# अनुक्रम

दिवा-स्वप्ने !

स्वप्नांचा
एक थवा
भिरभिरणारा
मध्ये
एक दिवा
जळणारा
जागृत मी
संयमी !

गुलबर्गा
१७-११.७५

चंद्रशेखर (कपाळे)

# गंधवती

माझ्या मनात अशीच
एक डहाळी डोलते
ऊन माध्यान्हीचे तिच्या
सावलीत विसावते

चंद्र स्वप्निल हळवा
तिच्या आड दडू जातो
काळ्या रात्रीच्या मनात
गोरे चांदणे ढाळितो

आला वसंत वसंत
माझी डहाळी फुलली
तिच्या सुगंधी मायेने
गंधवती मोहरली

काया कशी कोमेजली
दाह ग्रीष्माचा साहून
गार वारा घाली मला
मनी उसासे दाबून

वारा पाऊस नि गारा
अंगा अंगावरी मारा
तरी जपते जपते
तळी तिच्या मुशाफिरा

शरदाच्या चांदण्यात
रूप निळे नितळते
गोड गुलाबी स्वप्नात
जाई जुई शहारते

असा कसा हा हेमंत
भरे भयाने कापरे
पानाआड दडे पान
वारे सुटता चावरे

झडचा शिशिरात माझी
दिसे डहाळी खंगली
मनी वसंताची छबी
दिसे विरही रंगली

माझ्या मनात अशीच
एक डहाळी डोलते
ऊन माध्यान्हीचे तिच्या
सावलीत विसावते

---

सोलापूर २७–३–७५

## अशी असावी

अशी असावी
रात्र सावळी
श्रावणातले आर्द्र चांदणे
निथळावे शिरी
कृष्ण नभातून.
समोर धूसर निळी टेकडी
पायाखाली ओल थोडकी
अन् एकाकी !
वायुही यावा मंद गंधमय
पण चोरपावली
उबाया अन् वितळाया
मम निश्वसिते.
खळखळ झुळझुळ
नाद झऱ्याचा
ताल मनाचा,
आळवावे मग
ओले सुके
क्षण चार जीवनातले.
गहिवरल्या अंतःकरणी
भिजत भावना–
साकळाव्या ओल्या पापणी.
पुलकित काया
मुखरित व्हाया
निळ्या जगाच्या
हिरव्या आशा,
हळूहळू अन्
नकळत सारे
विरघळावे
मीपण माझे
भोवतालच्या
वातावरणी
चिंब !

उस्मानाबाद २५–९–५३

## कधि न तुला पाहिले !

कधि न तुला पाहिले
तरिहि मनी ध्यायिले

हिमधवल वर्ण तुझा
काया रति–मदनाची
नयन नीलकमल जसे
भ्रमुनि भ्रमर ज्यात फसे

सळसळत व्याळ काळ
स्कंधि, पृष्ठि, शिरी, उरी
इतरांचे मरण ज्यात
तुज भूषण शोभतसे

भिवयांच्या धनुकलीत
शर कधि वरदान वा
प्रलयंकर अग्नि कधी
भस्मिण्यास सज्ज असे

मंगल तू पावक की
संहारक रुद्रही
सृज-स्थित अन् लयकर्मी
नित नूतन नटशि तू

कंठि तुझ्या नीलमणी
चंद्रकोर भालि दिसे
कटुता जणु विश्वाची
पिउनि भालचंद्र हसे

रूप असे आगळे
ठायी ठायी ठाकले
कधि न तुला पाहिले
तरिहि मनी ध्यायिले !

हैद्राबाद १९५३

## केळफूल

जीवन सहकाराशी
आत्मवेल फुलारली
ऊन पाऊस वाऱ्याशी
बाळ माझी जन्मा आली

केळियांच्या दाटीवाटी
केळ एक गाभा गेली
दिसामासांचिया वाढी
केळ फूल प्रसवली



## नुकतेच

नुकतेच कुठे जे
जुळले होते धागे
तुटलेहि तटातट
क्षणभरच्या वादंगे
नव्हतेच कधी ते
तुझिया ध्यानि-मनी गे
विभ्रमेच भ्रमले
मन मृगजळा कुरंगे !

## भाव

तळमळे जीव
उमजाया भाव
उमजलो जरी
दाऊ केवी ?

दाखविण्या जाता
होईल अनर्थ
कोण हो समर्थ
सोसण्यास !



## गीत–लकेर

अशाच हसऱ्या रम्य प्रभाती
मऊ दुलइच्या उबेत उबता
साखर झोपी कुणी मिसळली
साय, मधाची धार ओतली

मन मोहरले, तनु तरतरली
रेशिमकाटा फुले वृत्तिवर
सुमनांची बरसात शिरावर
प्राजक्ताच्या थुयथुयली

मिटल्या स्मृतिच्या कळया उमलल्या
कणाकणातुन भ्रमर गुंजले
असंख्य स्वप्ने नेणिवेतली
ताल सुरावर रंगत फुलली

प्रबोधनी परि सख्या उमजले
ही तर तुझीच गीत–लकेर

हैद्राबाद ५–१२–५३

## ओढ जिवाची

आज उमगली ओढ जिवाची
सरली आशा जव भेटीची

सवे खेळलो रुसलो फुगलो
बाळपणीची जम्मत जगलो
तव न वाटले असली काही
हुरहुर मनि ही लागायाची

बाल्य संपले, यौवन फुलले
रसरंगी जणु नखशिख न्हाले
स्वप्नच का हे? गंधवती ही
बघता बघता पेटायाची

सुमनासम तू गंध दिला मज
ऋण न मानता मुकले रे तुज
पुष्पच तू मी माती उरले
तुझ्याच चरणी लोळायाची

हैद्राबाद ६–१२–५३

## गाऊ कुणाला गीत ?

गाऊ कुणाला गीत सखया
गाऊ कुणाला गीत ?

भाव फुलांची गुंफुनी माला
आतुर कर हा अर्पू सजला
फुले उधळली धागा तुटला
कशी सावरू प्रीत ?

स्वप्नसुखाच्या धुंद संगमी
भान हरपले वाहवले मी
बांध घातला फुटे संगमी
आवरण्याची रीत.

गीतामधुनी सुर ओसरला
शब्द निखळले भाव सांडला
कसा दाखवू आशय सुकला
भिजलेल्या अश्रूत !

## नको सरायास वाट

नको सरायास वाट
ही अशीच निरंतर
युगे युगे राहावीच
पुढत पुढती जात

नित ईप्सित क्षितिज
विशाल, विशालतर
गंध रस रंग नव
जावे गातच प्राशीत

तमिस्रेच्या नेत्रातही
घट प्रभेचे स्रवत
काळ्या कभिन्न मनी
ज्योत स्नेहाची तेवत

तृप्तीतही अतृप्तच
मन भ्रमावे शोधीत
मधुमानवता रस
चिरकालाच्या पुष्पात

शुद्ध बुद्ध हरपून
करावे मी हितगुज
अणुरेणूशी होऊन
वारा पाऊस नि ऊन

दाही दिशा सवे जणु
रासक्रीडा खेळे कृष्ण
मग नुरे दुजेपण
कण कण कृष्ण कृष्ण

आणि कधीकाळी जरी
मन जागले मधून
आणि केलाच विचार
अविचारातही वाटो–

नको सरायास वाट
ही अशीच निरंतर
युगे युगे राहावीच
पुढत पुढती जात !

हैद्रावाद २३–२–५४

## कातळ–काळिज

होते जरि मज तोडायाचे
जोडिलेस का रेशिमनाते ?

होते नव्हते फुलले यौवन
फुलविलेस मज रवि पुष्पासम
आज परंतु भ्रमरासम का
शोषुनि रस मज सोडायाचे ?

गुंफुनिया करपाश भोवती
बांधिलेस तन, विंधिलेस मन
आज परंतु व्याधासम का
'सावज' मज तू समजायाचे ?

पाडिलीस मज भूलभुलावण
भ्रमले रमले रतले तनमन
आज परंतु प्रीतिपुष्प का
निर्माल्यासम तुडवायाचे ?

स्वप्निल नयनी चित्र रेखिले
नवरंगी मी स्वये रंगले
आज परंतु कातळ–काळिज
रक्ताश्रूंनी भिजवायाचे !

हैद्राबाद ६–९–१९५४

## उसवली प्रीत–

निळ्या लाल आकाशात
फांद एकाकी डोलते
मीलनोत्सुक पक्षिणी
वाट सख्याची पाहाते

मंद वाऱ्याची लहर
पानातून सळाळते
भुऱ्या कातर वेळेस
मन उगी शहारते

सृष्टी शराबी धुंदीत
पुष्पशय्या शृंगारिते
नयनात अश्रुमाला
मन आर्त साद देते

सख्या संध्या संधिकाली
युगे युगे जी सांधिते
उसवली कोठे प्रीत
मुकी उभ्याने पाहाते !

सेलू १९५४

## कधी वाटते

कधी वाटते मेघ होउनी
गिरी शिखरांना चुंबावे
वैशाखातिल तृषार्त भूवर
जल होउनिया वर्षावे
मृद्‌गंधासम कधी वाटते
कणाकणातुन वितरावे
तृणपर्णातुन फलपुष्पातुन
रसरंगी न्हावे
मृदुल कोवळे ऊन होउनी
स्थिरचर करात कवळावे
जीवनातले अखंड चेतन
अचेतनातुन फुलवावे
सूर्य फुलापरि प्रकाशाभिमुख
मन माझे व्हावे
कधी रजनिची काळी किमया
पिउनी मस्त बनावे
दिक्कालाच्या अतीत होउन
व्यापुनि विश्व उरावे
मीपण माझे सोऽहंतेच्या
दिव्यत्वात विरावे !

हैद्राबाद १७—२—५५

## सखी

सखे तुझ्या दर्शनाने
मन माझे उजळते
रात्र काजळी दाटता
लक्ष दीप प्रकाशते

सखे तुझ्याभवतीचा
वारा होतसे बोलका
दोन मुक्यांचा संदेश
पोहचवितो नेमका

सखे तुझ्या हसण्याने
श्वेत कमळ लाजते
दग्ध उपेक्षिल्या मनी
शांत चांदणे फुलते

सखे तुझ्या सहवासी
'आज' वाऱ्यावर स्वार
चित्र 'उद्या' चे रेखितो
कालाच्या गे भालावर

सखे तुझ्यावीण उणे
गमे जीवनात प्राण
अपूर्णांकी मीलनात
गर्भ धरी ब्रह्मानंद !

हैद्राबाद १९५५

## मनचे मांजर

वर्षाऋतुच्या
अंधुक भुरक्या
पहाटवेळी
येते गाडी
कुठल्याश्या गावी
क्षण दो क्षण
थांबून घेते–
देते निरोप
कितिकां ही
हुंदके, हिसके
भपकारे अन्
सुस्कारेही !
विजय मदाने
खिकाळतच
ठाण्यामागून
ठाणे घेते,
धावते गाडी.
खच्चुन भरल्या
डब्यामध्ये
बसलेला मी
कोपऱ्यातल्या
खिडकीकाठी
ओठंगून–
मऊ, जाडश्या
ऊबदार
पांघरुणातून
पितात माझे डोळे
बाहेरच्या
पावसाची रिमझिम,
सप्तरंग अन्
नवलाईच्या
नऊ तऱ्हा.
अशात–माझ्या
मनचे मांजर
शुभ्र अंग मग
फुगवून करते
लाडिक गुरगुर
डोळे मिटुनी
जिभल्या चाटीत
दुधाळ, तुपाळ !

---
गुलबर्गा ३–८–५५

## पुनर्जन्म !

गुंतून राहते मन हे
का तुझ्या चिंतनी न कळे
पळ घटका दिन अन् रात्री
का तुझा ध्यास हे घेते ?

अणुअणूत ह्या काळाच्या
मुद्रांकित दिसती रूपे
तू तूच इथे तिथे गे
का वेड असे हे लागे ?

मन बावरते बघुनी सारे
वाचते नि उलटे पाढे
उलगडण्या जाता कोडे
हा ! अधिकच गुंता वाढे !

कधि अनुभविल्या गोष्टीने
मन जळले हे घाबरते
घडणार असे जे दिसते
बघताना का चाचरते ?

पण पुन्हा धीरही धरते
राखेत नवे जग बघते
अन् चिरंतनातिल एका
सत्यावर ते विश्वसते–

ही राखच अंतिम स्थिति ना ?
मग ती तर झालिच केव्हा
दिसते न गती मज पुढती
नव जन्म पावण्या परती !

गुलबर्गा १४–९–५५

# भिंती

ही एक भिंत, ती एक भिंत
एक खुजी तर दुसरी उंच
दगडामातीच्या, चुना विटांच्या ?
उंहूं– मग ?
सिगफ्रेड आणिक चायना भिंत ?
नाही (केवळ) त्यांच्यावद्दल बोलत
देशादेशापुढे आहे ही भिंत !
जातीजातीतून
घराघरातून
तुझ्यामाझ्यातून
आपल्यातुपल्याची
भिंतच भिंत !
नजर फिरेल तिकडे भिंत !
शतकांच्या मागे
कुणी बांधिली वास्तु
नांदल्या जिथे
कैक पिढ्या सुखेनैव
पण– छत कोसळले.
उरल्या आता भिंती
जीर्ण शीर्ण पडक्या भिंती !
वास्तुदेवता उठली अन्
उरला नुसता थयथयाट
भुतांचा !

नादमधुर झंकार लोपले
बरळतो आहे अशुभ समंध
जुनाट वठल्या पिंपळावरचा !
रडतात भेसुर कुत्री
धरतात दंश–
सर्प अन् फुरशी
किलकिलाट, घूत्कार
दिवसा दिवाभितांचा
अन् पडछायेला खिंडाराच्या
फुटते पेव फळत्या पापांचे !
झपाटलेला मानव गातो
सुरात मिळवुन बेसुरतेच्या
भेकड गीती 'भिती, भिती–
अमुच्या भिती, पुराणवस्तू
बहु असती आम्हां प्यार'
अडखळतील, धडपडतील
रक्ताश्रूंच्या अभिषेकांचे
सडे घालतील
कोसळलेल्या दगडामातीत
चिणून जातील
पण टरटरतील
'प्यार परंतु आम्हां अजुनी

जुन्या मनूच्या सुनाट भिंती !
ज्या भिंतींना देण्या मुठमाती
वेचले बुद्ध, येशु, महावीर
एकनाथ अन् संत कबीर
फुले ज्योतिबा, लोकहितवादी
दयानंद अन् आगरकरही
तळमळले हे किती महात्मे
ज्यांनी ' मानव तितुका एक '
महामंत्र हा उद्घोषिला
आचरिला अन् प्रचारिला
धडका घेऊन पाडिल्या भिंती
रक्तबंबाळले जरी–
नव्हतीच तमा भंगुर जिवाची
हाय परंतु–
अंधारातून प्रकाश आला
अंधारातच पुन्हा मिसळला !
अनेक आले, अनेक गेले
आणि मुखवटे मानवतेचे
चढले, गळले !
कृतघ्न, दांभिक
अजुनही कोणी
महामंत्राचा त्या

करितो उच्चार
सोयीनुसार !
फिरते पगडी
नाही फिरत डोके !
उभारल्या आहेत पुन्हा
त्याच भिंती
विस्कटलेले दगड गोटे
नव्या उमेदीने जमवून
रंगसफेती चढवून
मनामनाआड.
अजूनही खोडते पाय
स्वातंत्र्य–
बंदिस्त चिऱ्याआड !
अडतेच आहे, दडतेच आहे
रडतेच आहे– मानवता
भिंती भिंतीआड !

---

गुलबर्गा ७–१२–५५

## आज अकारण–

आज अकारण
मनात काही
ठसलं आहे
रुजलं आहे !
खडकाखालचं
खोल झऱ्याचं
हळव पाणी
लागलं आहे
मुरलं आहे !
भिनलं आहे
अंगांगावर
ठिबकलं आहे !
धारोष्ण उन्हाच्या
मदिर स्पर्शानं
धुंद झालं आहे,
पोसलं आहे

आणिक–
नवतीचं एक
हिरवं–पिवळं
धम्मक पान
निसवलं आहे !
निळचा गुलाबी
आकाशाचं
सुगंधी मन
प्यालं आहे !

गुलबर्गा २३–१२–५५

## सहवास तुझा–

सुमसम सुखसहवास तुझा
सखि सदन सुवासे दरवळले ग
चंद्रबिंब पुनवेचे हसले
मनात सखि तव नयन उतरले
कृष्ण कुरळ कचपाशतळी
मम अंग अंग मधु प्याले ग
अधरी अधिऱ्या अर्धम उठले
अर्ध्यामुर्ध्या ताल जिवाचे
ललित गीत लय लपली गात्री
लवलवता सम सुटली ग
चंचल श्वसनी हृद्घट हलले
नकळत हळवे भाव डहुळले
टिपता टिपता नयन करांनी
मन आंचळ क्षण चळले ग
सुटली सम अन् आंचळ चळले
हारवले अन् काही जुळले
लपले उकले रेशिम कोशी
कुठे काहिसे गुरफटले ग
पहिल्या वहिल्या क्षणात स्रवले
मत्तमधुर मम मनी चांदणे
निशिदिन लुटिले आजहि लुटितो
नित नवता तव खुलते ग

गुलबर्गा २७–९–५९

## फळे डहाळी–

काय अचानक घडले ग
उभारपणची चढी मुजोरी
अताच का विरघळली ग
अंगांगाचा वार दुधारी
विद्ध शिकारिच दिसतो ग
नवथरतेच्या चंचलतेची
कशी भुलावण पडली ग
थिरक चालिची फिरक भिंगरी
मंथरचरणी लपली ग
अवखळ बिजली-कटाक्ष विझुनी
दीप तेवतो नयनी ग
गुलाब गाली फुले केवडा
आंगि आगळे पाणी ग
फुलात विरली कळी कोवळी
फळ आतुर अवघडले ग
सरली हिरवी नवी नव्हाळी
फळे डहाळी लवली ग !

गुलबर्गा १९६१

## छंद गवसला !

आज मला मम छंद गवसला
दिवस यामिनी वणवण भटकुनी
जे न कधी मज दिसले नयनी
काळाच्या क्षण अतीत होउनी

मनास माझ्या डोळा फुटला.... आज मला....

खटपट घटपट कितीक घडली
नकळत कुठली लय सापडली
खळखळल्या जव मनी भावना

शब्द सचेतन होउनि उठला ... आज मला....

ग्रीष्मदाह कधि करी काहिली
वर्षा जणु चिडविण्याच सजली
हिमात गोठुनि सुकली गात्रे

अवचित मनि मधु वसंत फुलला.... आज मला....

- सुखदु:खाचा सागर मथुनी
तीव्र हलाहल भग्न मनाचे
पचवुनि मिळवुनि कुंभ सुधेचा

धन्य क्षण हा अमर जाहला.... आज मला....

  

आज कसे हे नवल वर्तले
लोह अकल्पित कांचन झाले
शिला भंगुनी जीवन नटले

कल्पवृक्ष काष्ठातुन फुलला.... आज मला....

आज उमगल्या संभव वेणा
व्यथा गर्भिची प्राणधारणा
नवजाताच्या सुखद दर्शनी

सुभगांचळ हा फळफळला.... आज मला....

संचित सुकृत कसा लागले
शब्द नवरसा अर्था व्याले
कृतार्थ जीवन यथार्थ झाले

संतांनो हा प्रसाद अपुला ! .... आज मला....

बंगलोर प्रवास १९६०

## उजळ लोचनी !

अवकाशाच्या गवाक्षातुनी
पाहत मजला तुझेच डोळे
जाणवतो तव स्पर्श सुधामय
सदा उमलत्या सांज सकाळी

स्रवते करुणा जलधारांनी
खळखळते कधि कातळातुनी
तव मायेला येई भरते
उधाणलेल्या सागरातुनी

सुगंध भरला दाहि दिशांना
गीत मधुर तव भरले श्रवणा
रूप असे तव अरूपतेचे
रोमांचातुन मनी उतरते

भावरूप तव नित आकळते
तरीहि अंतर का तळमळते
क्षर शब्दांच्या थिटया करांनी
अक्षर तुज कवटाळू बघते

इथे तिथे तव दिसत खुणा या
चाहुल लागे नकळत हृदया
गहिवरल्या अवघडल्या गगनी
निवळ मळभ, क्षण उजळ लोचनी!

## सीमोल्लंघन

आज करूया सीमोल्लंघन
    शतखंडित हे अवघे जीवन
    जीवन कसले अडले पाणी
    सडले साचुन घाण युगाची
    बांध धडाधड टाकू फोडुन

कुठला ब्राह्मण कोण शूद्र हो
माती एकच कुंभ निराळे
काळा गोरा वर्णहि लटके
तेच रक्त हो नसानसातुन
    जिकडे तिकडे सीमा—सीमा
    नकोच शापित सीमित जीवित
    असीम गगनी मारु भरारी
    तोडु तटातट कृत्रिम बंधन

जे न साधले इतिहासाला
मिटू न शकला डंख युगाचा,
हलाहलाला पचवू आपण
वर्तमान युग निर्मू नूतन
    सीमेवरती शत्रु सदाचा
    टपून बसला घाव घालण्या
    सुसज्ज सेना तत्पर राखू
    जिंकू सीमा ! जिंकूया मन

युगायुगाची पुटे झडू द्या
सहजीवन संजीवन फुलता

काळावर चिर अंकित होइल
मनामनाचे मंगल मीलन

आज स्मरू त्या मुक्तात्म्यांना
बुद्ध बसव अन् गांधीजींना
प्राणपणाने झुंजत ज्यांनी
बलिदाने भू केली पावन

आज उगवला सोन्याचा दिन
उजळित लांच्छित वंचित जीवन
तमा न आता घोर तमाची
ज्योत पेटता निज हृदयातुन

आज दिवस हा आनंदाचा
दुष्ट दमन सुख विजयोर्मीचा
सत्य शिवाचा सुंदरतेचा
ध्यास जिवाला राहो लागुन

महन्मंगला मानवता ही
उभी कधीची दारी घेउन
आतुर नयनी भावनिरांजन
करण्या यशवंतांचे औक्षण

सोने कसले मने लुटूया
प्रेम देउनी प्रेम घेऊया
हृदयाहृदयामधून ऐकू
चिरंतनाचे अनंत स्पंदन !

---

म्हैसूर ९–१०–१९६२

## अगा कधी जे ...

एक असा सुगंध येतो
दूर कोठे खेचून नेतो
शिखर शिखर फिरत जाई
क्षितिज कोठे उरत नाही !

एक असा सूर येतो
मुक्या तारा छेडीत जातो
वारा सारा पारा होई
कणाकणात भरून जाई !

एक असे फूल फुलते
फुलता फुलता विरून जाते
रूप परी विसरून जाई
ठाई ठाई दिसत राही !

एक असा थेंब येतो
बघता बघता दर्या होतो
पाणी सारखे चढत जाई
उतार ज्याला माहीत नाही !

एक अशी ठिणगी येते
राखेलाहि पेटवून जाते
आत बाहेर लाही लाही
विझणे तिच्या हाती नाही !

एक असा क्षण येतो
दिसतो तसा मुळीच नसतो
दावीत जातो काहीबाही
अगा कधी जे घडणे नाही !

गुलबर्गा २२–८–६६

## संथ जलाशय आणि –

एक संथ जलाशय
शांत निरामय
पौषातली पहाट
जिवाला भिडणारा
गहिरा गारवा
गर्द किनारा
झुकल्या वृक्षावरून
उतरत्या वेली
धुक्याच्या दुलईत
जागणारा नीलिमा
फुलांच्या शेजारी
बदके दोन
पंखी खुपसून चोंच
तरंगणारी निवांत मग्न
घरट्याच्या उबेतून
चाळवलेली सुरेल तान
बिलगू जाते
पश्चिमेच्या दारी
(रात्र संपली तरी)
रेंगाळणाऱ्या
लंपट चंद्राला !

दुसरीकडे
एक कुत्रे
मरतुकडे
हमरस्त्यावर
मातीच्या खळग्यात
मुटकुळे अंगाचे
उबवीत असता
हरवून बसले
आपले पेकाट
भरधाव धावणाऱ्या
ट्रकखाली.
केकाटत सुटले
धुळीच्या लोटात
दोनच तंगड्यावर
फरफटते आहे
मोडले पेकाट
असह्य यातना
कंठाला शोष
लोंबती जिव्हा
व्याकुळ नजर
दिसेना पाणी
आणि जलाशय
किती तरी दूर
संथ शांत !

---

गुलबर्गा १५–१२–६६

## खडक

तृषार्त व्याकुल
ग्रीष्मतप्ता
वसुंधरा
अतृप्ता, विरहार्ता
मृगासक्ता, स्वागत सज्जा
स्वप्निल नयनी
रेखीत होती
निळ्या मेघावर
झुलत येणाऱ्या
मृगराजाचे
सावळे साजिरे
समृद्ध रूप–
फुटू पाहाते
सुगंधाचे गीत
हळदिव्या तृणांना
कणाकणातून
आसुसलेल्या
गात्रांच्या
तरळत होता
हरितनील
स्वप्नसुगंध
ओटीपोटावर
झळाळले
मोत्यांचे पाणी !

मृगाचा डोळा
विश्वामित्राच्या
आसक्तीसारखा,
विरक्तीसारखा
क्षण पाणावून
कोरडा ठणाण.
बिचारी धरा
वंचनेने गेली
पार होरपळून
जिवाची तिच्या
फुटली लाही
कितीक नक्षत्रे
आली नि गेली
अश्रूंनी दयेच्या
कांहीनी सिंचिली
वंचनेची आग
कशी ती विझावी ?
जळत्या कळीचे
हृद्‌गत जाणून
हळहळला वळीव
आसवांनी कसे
उमलावे हासू ?
हस्ताने केली
भलतीच धिटाई

नागडी मस्ती
लोचटपणाने
लगटून केला
तुफान वर्षाव
प्रेमाचा तीवर
टाकिले पुरेच
पुरात बुडवून.
नाही परंतु
फुलले रोमांच !
हिरवा काटा
झडला होता
अंकुर होते
गेले जळून
सारेच निष्फळ
वाया हो जीवन
जीवन सत्वच
वाहून जाता
पुरात हस्ताच्या
उरले उघडे
खडक ताठर
विषण्ण भीषण
खडक, खडक !

## वळीव

वळता पळता
वळीव वळला तर
येईल तजेला
नवा कुणाच्या
सुकल्या मळ्याला
फुटतील कोंब
तांबुस हिरवे
अदृश्याच्या
पिंगट भुरक्या
डहाळीला !
गंध पाखरू
मातीच्या फुलातून
वेध घेईल
निळ्या अनंताचा !
ठिबकत राहील
मधूचा थेंब
घटभरल्या
तृप्त काठावर !
वळीव वळला तर
फळेल कुणाचे
झुरमुरले
ईप्सित !

उस्मानाबाद २६–५–६८

# प्रीतीची रीत

'माझ्यात पाहिले काय
म्हणूनी जीव, लाविता मजशी'
तू पुन्हा पुन्हा गे पुसशी

का झरा करुनि गे त्वरा
खुळचागत खरा, खळखळत जातो
का नदीस आलिंगितो ?

का तुफान सागर करी
धरितसे उरी, चंद्र जरि नभि तो
फिरफिरून उधाणत येतो

का मदनदाहका भिल्लिण मोही तरी ?
तो कसा भाळला कृष्ण राधिकेवरी ?
का कुणी पैलतिर गाठी प्रेतावरी ?
सिंहासन सोडी कोण कुणास्तव परी !

आकृष्ट होत ज्या गुणे
नित्य जनमनें, सखे ते वसते
मन्मनात नाजुक नाते

का पतंग झेपावतो
दीपकावरी, दग्ध हो जरि तो
आनंद कसा त्या मिळतो ?

शब्दास जरि न आकळत
हृदय तळमळत, प्रीत उन्मळते
मन मनास आपसुक मिळते !

गुलबर्गा १९६९

# फिनिक्स !

कशासाठी हट्ट असा
आत येण्याचा
काळ्या गहिऱ्या अंधारात
डोकावण्याचा
कधीचे हे दार केले
होते मी बंद
कडेकोट किल्ला जुना
जणू चिरेबंद
आत आता फिरकणार
नव्हता जरा
बाहेरचा खारा
मस्तवाल वारा
लाजाळूच्या रोपांना
चिरडणार नव्हता
कोतवाली बुटांचा
भयानक दरारा
रेशमाचे तंतू विणीत
स्वत:भोवताली
गुरफटणार होती एका
कोशातच आळी
विश्व जसे निघाले म्हणे
केवळ शून्यातून
जाणार होते तसेच एक
शून्यात विरून
कशाला उतरलास
नजरेच्या दोरावरून !
चतुराईने माझा
गाफिल क्षण हेरून
अशा वेड्या धाडसाचा
परिणाम काय होईल ?
प्राण पतंगाचा जसा
जळून राख होईल
कोण पतंग, कोण दीपक
कसली आग, कोण जाणे !
जळणे केवळ नशीबी आहे
पुढचे सारे कूट उखाणे
पतंग म्हणू की फिनिक्स
जळाला तरी एकदा
राखेतून ही संभवतो
जसा सदान्कदा !

गुलबर्गा १९६९

## वस्त्रहरण !

किती किती दिवसांपासून
रचला होता बेत मनोमन
कधी तरी मुक्त होऊन
दिठी मिठीचा भोगू क्षण !

चिंतनात तुझ्याच मग्न
झाले मन सहज उन्मन
असा कसा आलास हेरून
गडे माझे बेसावधपण !

पणात नव्हते आले मीपण
घराभोवती चढले कुंपण
कड्या कुलूपे गेली गळून
कळले नाही तुझे आगमन

नव्हती माझी मलाच जाण
वस्त्राचेही नुरले भान
सुषुप्तीच्या ग्रंथामधून
वाचलेस तू पानन् पान !

नेणीवेच्या अंधारातून
रतला कोठे प्रकाशकण
जागेपणी पटता खूण
बावरले बघ वेडे मन

जपू कशासाठी कुंपण
उभा मळा नेला लुटून
झाले झाले वस्त्रहरण
तुझ्या हाती लज्जारक्षण !

गुलबर्गा ३–२–१९७०

  

## मृगजळ !

तू तर एक मृगजळ आहेस !
जित्या जिवाचा छळ आहेस
तहानेने व्याकुळलेल्या
भकास डोळ्यांना
शीतल जलाचा मोह
पडणार नाही का ?
कशासाठी आशा
नसत्याची निर्माण केलीस ?
बरे होते वाळवंट
भट्टीसारखे भाजून काढणारे
झाली असती जिवाची लाही
परंतु एकदाच ना ?
हे पुनः पुन्हा
जननं—मरणम्
घडीघडीला पाहून माझे
कसला आसुरी आनंद
होत असेल तुझ्या जिवाला ?
भांबावल्या जिवाने तुझ्या
भावूक रूपाला भुलून
उगी कवटाळावे वाऱ्याला !
शोधावा आधार बंबाळ जिवाला
गावे तुझे उदारपण

नसते उगी जे नावापुरतेही
खरे सारे कृपणपण !
परंतु–
हे सारे हेत्वारोप
मी कुणावर करतो आहे ?
तू तर एक मृगजळ आहेस ना ?

गुलबर्गा ११–१०–७१

## भले बहाद्दर–

भले बहाद्दर वीर जवाना
प्राणपणाने जिंकिले रणा

याह्यासुर तो अरी मातता
गौरी बनली काली माता
धाउन गेली सुसज्ज सेना । भले बहाद्दर ...

अन्यायाचे नरडे चिरण्या
मानवतेचे सत्व रक्षिण्या
सदैव जागृत भारत जाणा । भले बहाद्दर....

तू ना हिंदू, मुसलमान वा
क्षात्रधर्म तुज एकच ठावा
दक्ष सदाचा राष्ट्र रक्षणा । भले बहाद्दर...

संकटसमयी स्वत्व जागते
देशाभिमाना भरते येते
भिन्नतेतही एकच बाणा । भले बहाद्दर...

तुझ्या यशाची गौरवगाथा
निज रक्तांने लिहिली जाता
स्फूर्ति पिढ्यांना गाता गाना । भले बहाद्दर...

तुझे शौर्य अन् त्याग भावना
जगी मिळेना तयास तुलना
उंच जाहल्या अमुच्या माना । भले बहाद्दर...

तुझ्या पाठिशी राष्ट्र उभे रे
कोटि जनांचे तुलाच मुजरे
भारतभूच्या पंच प्राणा । भले बहाद्दर...

---

गुलबर्गा १–१–१९७२

परब्रह्म !

परब्रह्म !
केवळ अनिर्वचनीय !
तिथेहि अवचित
स्वयंभाव जागृत होतो
आत्मज्ञानात्मक शक्ति
क्रियाशील होते
निजास्तित्वाचा
भावानंद—परमानंद
लुटण्याचे तिला
डोहाळे लागतात !
अतिमानस स्फुरण पावते
आणि अव्यक्त मन
जीवात्म्याच्या रूपात
घर करते
एक व्यक्त नवजीवन अंकुरते !
किलकिल्या नेत्रांनी
पाहाते जगाला
आणि आक्रंदते
कोऽहं ! कोऽहं ! !
आपणच व्यालेल्या
मायेच्या पटलात
गुरफटून जाऊन
परब्रह्म वेडे फोडते टाहो
कोऽहं ! कोऽहं ! !
चैतन्य असे
मृत्तिकेत अवतरते !
मुक्तात्मा असा होतो
वद्ध जीवात्मा !

× × ×

जीवात्म्याच्या ठायी
असतो परंतु
सुप्त निदिध्यास
आत्मोद्धाराचा !
चैतन्यशक्तीचा
तुटलेला खंड
भिरभिरत असतो
त्याच पराशक्तीच्या
सामर्थ्यकक्षेत
भ्रमण – स्थिती ही !

× × ×

अनंतकाळाच्या
एका दिव्य क्षणी
चिरंतनाच्या चैतन्य गर्भातून
उतरतो एक
तेजोमय ज्ञानकिरण
जीवात्म्यावर !

गळून पडतात
अज्ञान–अविद्या !
मातीला ओढ
लागते आकाशाची
घुमू लागतो
सनातन घोष
तिच्या गर्भातून
अहं ब्रह्मास्मि !
अहं ब्रह्मास्मि !!
चालते धडपड
रात्रंदिवस
मायापाशातून
मुक्त होण्याची !
उत्कट प्रेरणेला
तपश्चर्येला
कालांतराने
लाभतेच लाभते
महामातेची दैवी कृपा !
होते मीलन जिवाशिवाचे
सिद्धी जन्मते
आपसुक तेथे
आनंदी आनंद !

परमानंद !!
अहंकाराचे भांडे फुटते
घुमतो नाद–लयबद्ध
सोऽहं ! सोऽहं !!
पूर्ण ब्रह्म, परब्रह्म !

× × ×

अनादि अनंत
जीवनचक्र हे !
कालसरितेच्या
अखंड प्रवाहात
जीवन बुद् बुद्
अखंड उठतात
कमळं मात्र क्वचित
उमलतात !
त्यातून विकसते
शतकाशतकातून
एखादेच ब्रह्मकमल !
जळमातीच्याच पोटी
जन्मते ब्रह्मकमल !
ध्यास असतो परंतु ज्याच्या
आत्मसुगंधाला
विश्व व्यापण्याचा !

स्वर्गाला स्पर्शून
भूमितलावर
स्वर्गालाच आकर्षिण्याचा
सहवासाने ज्याच्या
गंधित होते–पुनीत होते
पृथ्वीची माती !
कमळाचे स्वप्न
असते परंतु
मातीची व्हावी
कमळेच सारी !
मी अरविंद !
विश्व अरविंद !
पूर्णयोग
परब्रह्म !

गुलबर्गा १५–८–७२

## पंचविशी !

स्वातंत्र्याची
पंचवीस वर्षे
जवानीची !
देशासाठी बरेच काही
करण्यासाठी–
काळ तसा मोठा आहे
(म्हटला तर छोटा आहे)

कोणी म्हणेल–
योजिले काय,
केले काय ?
(झाले काय, हाय हाय ! )
राहिले काय ?
पायाखाली,
दृष्टीसमोर,
मागे वळून
(सिंहासारखे)
पाहिले काय ?

म्हणेल कोणी–
'पंचविशी' च
बोलून चालून
बरळणे अन्
उधळणे
गोंधळ असा,
लाथाळीचा
सुकाळ तसा
शोभून जाय

कोणी म्हणेल–
उमेदीचे वय असे
वाया घालवून
चालेल कसे ?

म्हणेल कोणी–
काही बाही
म्हणणाराला
(खाज भारी–लाज नाही)
आम्ही म्हणू–
आमचे तट्टू
(जेथे तेथे)
अडेल तेथे
पेंड खाता
(फुकटची)
राहील काय ?

---

गुलबर्गा १५–८–१९७२

# कोडे

कुणी कोडे माझे उकलिल का,
कुणी भविष्य अमुचे कळविल का ?

कुणी खातसे रोज तुपाशी
असंख्य मरती दीन उपाशी
'हटाव गरिबी' वर मखलाशी
गरिबी कधि तरि हटेल का ?

नेते पिकती गल्लोगल्ली
मनी योजिती 'गाठू दिल्ली'
चोरा हाती पडता किल्ली
घरची राखण होईल का ?

लाचेवरती कुत्री जगती
शील भिकारी भटके जगती
उजळ मुखाने खळ वावरती
नीति न्याय मग उरेल का ?

एक गिरीजन, दुसरा हरिजन
ब्राह्मण कोणी, तिसरा ख्रिश्चन
भेद–भुते ही किती पुरातन
मांत्रिक कुणी त्या उतरिल का ?

कन्नड पत्नी, पती मराठी
कधी उलटही दिसे रहाटी
जुन्या नव्या जरि मातू गोष्टी
जळत्या सीमा विझतिल का ?

तरुण पेटते, रक्त भडकते
वाया जाते, कुणा फावते
कोण बाहुले करि नाचविते ?
निज कर्तव्या कुणि जाणिल का ?

भिन्न देश भाषादि भेद जरि
एक पित्याची मुले न न्यारी
उच्च नीचता विसरुनि सारी
बंधुभाव जगि येईल का ?

गुलबर्गा १९७३

## एक आनंदयात्री !

शंकरराव आळंदकर
नव्हे आनंदकर !
गुरुजी
नूतन विद्यालय–कला विभागाचे
तुम्ही आदिनाथ !
तुम्ही माझे साक्षात् गुरु नव्हता
मी तुमचा प्रत्यक्ष शिष्य नाही
–एवढे भाग्य मला लाभले नाही !
तरी पण तुमचे गुरुत्वाकर्षण
सतत जाणवत होते
मी तुमच्या कक्षेत–अंतरावरून
फिरत राहिलो
परावर्तित प्रकाश वेचीत राहिलो
कलेचा कणही हाती न लागता
तुमच्या तेजाने दिपत राहिलो.

× × × ×

शंकरच तुम्ही !
उपेक्षेचे, वंचनेचे
हलाहल पचवून
कलेची गंगा तुम्ही
शिरी वाहिलीत
भोळेपणा तुमचा

तुम्हालाच नडला—कित्येकदा.
तरी तुमचा हात
विद्यादानात कधी नाही अडला
गुरूचा गुण—विद्यादातृत्व
तेथे तुम्ही पाहिले फक्त सत्पात्र !
साधकाची तुम्ही जात नाही पाहिली
जातीचा पक्षपात जन्मजात
जुना शाप भारतियांचा—
तुम्हाला नव्हता बाधला !
ब्राह्मण, सोनार,
लिंगायत, कासार
कोणीही शिष्य तुम्हाला
सारखाच प्यार !
तुमची क्षितिजे ओलांडून कोणी
नवी क्षितिजे निर्माण केली
तुमच्याच शिष्यांनी.
गुरूचे हृदय हरखून गेले
भरून आले—कौतुकाने
शिष्यादिच्छेत्पराजयम्
खलु नास्तितत्त्वं गुरोः परम् !

× × × ×

तुमच्या कलेच्या कक्षेत आलेले
विषयही मोठे !
तुमच्या 'Vision' मध्ये होते

गुरुदेव टागोर–रविवर्मा
शरणबसवेश्वर–पुरंदरदास
गीतातत्त्व–सांस्कृतिक प्रतीके !
दिव्यत्वाची जिथे प्रतीती
लाभली तेथे कुंचल्याला गती !
झाले चित्रांकन–
दिव्यत्वाचे, चारित्र्याचे !

× × × ×

जीवन तुमचे सामान्याचेच
व्यवहाराच्या सामान्य बंधनात
तुम्ही बंदिस्त होता तरीही–
तुमच्या मुक्त कलेने
वास्तवातून शोधले सौंदर्य
आदर्शाप्रत घेतली झेप
प्रतीकात्मतेच्या पायऱ्या चढून
अध्यात्माची परतत्त्व शिखरे
अवश्यच गाठली तुम्ही !
आधिभौतिक, आधिदैविक
भोगांचे शोषून खतपाणी
अध्यात्माची नाजुक वेल
मांडवावर चढत होती
तिच्या फुलांची अरुवार नक्षी
तुमच्या कलेतून साकारत होती !
तुम्हाला सापडला होता
कलानंदाचा अमोल ठेवा !

पाय खडतर वाटेने रखडत होते !
वाहत्या जखमेतून होते झरत
हृदय रक्ताचे जीवनसंगीत
धुंदीत त्याच्या बेभान तुम्ही
सत्य सौंदर्याचा शोध घेणारा
आनंद यात्री !

× × × ×

रंगरेषांच्या बंधनापलीकडील
दिव्य तुमची अंत:सृष्टी
माझी दृष्टी वेधून घेई–
शंकर–शंकर–गगनचुंबी
उत्तुंग धवल गौरीशंकर !
सूर्यतापाने तपणारी तळपणारी
विरघळणारी–शांत शिखरे !
अखंड झरणारे अनंत निर्झर !
कशाकशाला न जुमानता
धरतीच्या अंगावर
बागडणारी असंख्य बालके
अध:स्तरावर खळखळणाऱ्या
तृषित धरित्रीला तोषविणाऱ्या
सुफलित करणाऱ्या सुजला सरिता !
पूर्णत्वाच्या सागरओढीने मीलन धुंदीत
बेभान धावणाऱ्या अभिसारिका उत्कंठ,
आनंदयात्री ! आनंदयात्री !

---

गुलबर्गा २–३–१९७३

# निवृत्तीतील कर्मयोग !

निवृत्तीचा क्षण सिंहावलोकनाचा
आपला आपण वेध घेण्याचा
जीवनाच्या मध्यावर
बावरण्याचा, सावरण्याचा
मागे पुढे पाहाण्याचा !
आला दिवस मागे जाय
केले किती राहिले काय ?
वृक्षवेली लावलेल्या
फळाफुलांनी डवरल्या काय ?
येथे असते मंझधार
इथल्या पाण्याला ओढ फार
प्रवृत्तीच्या आवर्तानें
निवृत्तीच्या व्यावर्तानें
जीवन भासे सारे असार
भावगुंत्यात गुंते विचार
शोधीत राही सारासार
इथेच लावता थोडा नेट
परतीराची होते भेट
निरामयाच्या, तृप्तीच्या
अलिप्ततेच्या प्रवाहातून
संथ–सुखेनैव !

× × ×

असतो कोणी भाग्याचाही–धीराचा
जीवन ज्याचे कृतार्थ असते
हिशेब चुकले असतील कधी
तरी कुणाचे देणे नसते
असलेच तर येणे असते
–ज्याची त्याला फिकीर नसते–
कडु, गोड असेल तसे
रसिकतेने चाखले असते
जीवन, ज्याने पचविले असते
जमेल त्याच्या कल्याणास्तव
चंदनासारखे झिजविले असते
नसते पोकळी, नसते रितेपण
पुढे काय हा प्रश्नच नसतो
करायचे इतके हाती असते–
प्रश्न असतो निराळाच
'उरले आयुष्य पुरेल काय ?
गगनभेदी भरारीला
पंख साथ देतील काय '?
होईल, जसा असेल योग
योगायोग–कर्मयोग
कर्मयोगी धन्ययोग !

गुलबर्गा २४–३–१९७४

## सूर्य आज विझला !

एक सूर्य उगवला होता
आयुष्यभर तो जळला होता
या मातीचा तो बाळ होता
अंधाराचा काळ होता !
तोच सूर्य आज विझला
आणि सारा अंधार माजला !
रामापासून येशूपर्यंत
बुद्धापासून गांधीपर्यंत
साऱ्या महापुरुषांचे तेज
अवतरले होते ज्यात
हरवला कसा तो एका क्षणात !
भारतीय संस्कृतीच्या
सनातन वृक्षावर
उमललेले ते एक
अलौकिक तेजस्वी फूल होते
सुवास ज्याचा दरवळत होता
जगाच्या कानाकोपऱ्यात
भारावली मने लहान थोरांची
पूर्व-पश्चिमेची, विश्वमानवाची !
दिसला होता त्याच्या रूपात
अवघ्या मानव्याचा दिव्य विलास !
आदर्श विकास !

या मातीचे ते सुंदर मूल–
सुगंधी फूल
काळाच्या अज्ञात हातांनी
आज कसे अलगद खुडले होते
मातीच्या कुशीत
हसत हसत दडले होते !
भूमातेच्या पदराआड
शांत निरामय पहुडले होते !
पाऊणशे सर्गांचे महाकाव्य ते !
रोमहर्षक प्रसंगांनी नटलेले
स्फूर्तिदायी चैतन्याने चेतलेले
भावनांच्या उमाळ्यांनी रसरसलेले
कारुण्याच्या किनारीने झालरलेले
बालकाच्या निरागसतेने बहरलेले
ते जिवंत महाकाव्य
आज एकाकी संपले होते !
महाकवींच्या कल्पनेतले
दिव्य त्यांच्या प्रतिभेचे
शतकांच्या पुण्याईचे जणु
ते गोड फळ होते !
आज अचानक गळले होते
जळले होते आणि–
राहिली होती धूळ
भूमातेच्या चरणावरची पवित्र धूळ
अश्रूंच्या नद्यांत, नद्यांच्या जीवनात

मिसळून गेलेला पावन अंगारा !
अंगार होऊन फुलणार आहे
उद्याच्या रक्तात !
या मातीच्या कणाकणात
पसरली आहेत त्याच्या रक्षेची
अनंत बीजे !
घातलेच पाहिजे आपल्या रक्ताचे
आणि घामाचे खतपाणी त्यांना
कशी उगवतील ती त्याविना ?
त्याच्या स्पर्शाने पुनीत झालेल्या
पाण्यातून
त्याच्या सत्वाने सकस झालेल्या
धान्यकणातून
पोसणार आहे उद्याचे जीवन
भारतीय जीवन !
सरितांनी त्याला सावरून घेतले ना
आपल्या कुशीत !
नेला आहे त्याला जोजवीत
उदार सागराच्या विशाल हृदयात
होऊन आता दयाघन तो
वर्षणार आहे तुम्हा आम्हांवर !
पर्वत-शिखरांची वाढविली आहे ना
त्याच्या देहकणांनी उंची !
म्हणून त्यांची मान
राहील अशीच ताठ

अन् अभेद्य छाती
रक्षिण्यासाठी मानव्याची लाज
दुष्टांच्या हाती
फुलाफळातून उमलणार आहे
निर्व्याज त्याचे सुंदर हांसू !
मातीच्या कणांना होणार आहेत
बाळे उद्याची !
एकेक बाळ–रत्नच ते
जवाहराचे–लाख मोलाचे
जगातला अंधार मरणार आहे
त्यांच्या उदयाने–
गर्भात आहेत अजून ती बाळे
तोवर राखूया निगा
या मातीची–आपल्या मातेची
लावूया पणाला सर्वस्व आपले
सांभाळण्यासाठी मातेची अब्रू
असल्या अभागी नाजुक क्षणी
येणार आहेत ती कार्तिक बाळे
तारकासुरांचा निःपात कराया
मानव्य रक्षाया !
उर्वीतली या स्वर्ग निर्माया !
तोवर राखूया
निगा या मातीची–
सती मातेची !

गुलबर्गा १९–२–६५

## पाऊलखुणा

पृथ्वीचा आस ढळतो जेव्हा
तुफान वादळ – प्रलय काळ !
आणि चिरडली जाते मानवता
पाशवी वृत्तीच्या नंग्या नाचात.
रक्तपिपासा मोकाट सुटते जेव्हा
दुर्बळांच्या अगतिकतेचा घोट घ्यायला
परंपरेच्या गर्तेत डुंबत असतात
चाचपडणाऱ्या आंधळ्यांच्या माळा
गतानुगतिक !
दिवस–रात्रीचा भेदच नसतो उरलेला.
उरलेली असते जाणीवहीन नुसती वळवळ
बुडबुडणाऱ्या डबक्या डबक्यात,
कोणी म्हणतात झाला युगांत !
परंतु असते ती प्रसववेदना काळरात्रीची
कोणी युगंधर हिरण्यगर्भ–प्रकाशमान
मोहन कांतीने उजळीत येतो नवी क्षितिजे
आणि संचरते नवचैतन्य जडमूढातून
'नवयुग' रांगू लागते पुन्हा नव्याने–
घालायची असते आकाशाला गवसणी त्याला !
नव्या युगाची नवी वाटचाल–

युगंधराच्या अंतापर्यंत !
अंत त्याचा अंती एकच
विष–फाशी किंवा पिस्तुलाची गोळी
चंदनाच्या चितेत चंदनाची होळी !
आणि पुसटतात त्याच्या पाऊलखुणा जेव्हा
बावरलेली मानवता बिलगून बसते
त्याच्या शब्दांना– 'संभवामी युगे युगे' !
वाट रिती असते आणि तो येणार असतो !
बुद्धापासून बापूपर्यंत
याच वाटेने गेलेले असतात–
वाटेवरच्या पाऊलखुणा
रितेपणाला सोबत करतात !

गुलबर्गा ११–६–६९

## महात्मा आणि आम्ही

तळापासून हलल्याशिवाय उगी काही लिहू नये
ऊठसूठ महात्म्याच्या महात्म्याशी खेळू नये
असेल झाला महामानव आपले त्याचे नाते काय ?
जमेल तितकेच ताणावे नसता उगी फाटून जाय

फार तर त्याला देव मानू तस्वीर टांगून देव्हाऱ्यात
सूत जमवून हार घालू त्याच्या ( अथवा आपल्या ) गळ्यात
सत्य, शांती, अहिंसा असतील तत्त्वे मोठी सनातन
आचरणाराच महात्मा होतो हेही सत्य पुरातन

परंतु होतो एखादाच म्हणून त्याचे मोठेपण
गल्लीबोळात दिसताना महात्म्याला पुसेल कोण ?
काव्यात कमळे फुलावीत उपदेशाचे खडक कशाला ?
हलके फुलके विषय तसे बरे असतात पचायला

झाला गेला महात्मा काय जगाचे अडले आहे ?
भांडण तंडण असले तरी तसे बरे चालले आहे
शताब्दीच्या निमित्ताने असे जमणे बरे असते
गाणे अथवा रडगाणे काही तरी साधून जाते

घड्याळाच्या काट्यावर जीवन मरण धावत आहे
मेलेल्याला उकरायला इथे कुणाला सवड आहे ?
शंभर नव्हे लाख वर्षे होतील त्याच्या जन्माला
कोपरापासून हात जोडून लागू आपल्या कामाला !

गुलबर्गा १९–२–६९

## बापू

सत्य अहिंसा आणिक प्रीती
बापू तुमची प्रतीक मूर्ती
त्यागामधली दडली शक्ती
तुम्ही दाविली आत्मस्फूर्ती
मौनातही तुमच्या अर्थ असे भरलेला
स्पर्शात करांच्या परिस असे दडलेला
मातीचे बनले सुवर्ण तुमच्या हाती
ती तुम्ही दाविली मानवतेची नाती
ते तुम्हीच होता सहिष्णुतेची द्वाही
शत्रूस शिकविली प्रेमाची अ–आ–ई
शरिरावर झाली भ्याडांचीच चढाई
'हे राम' मुखातुन, अमरपणाची दे ग्वाही
कधि युगायुगातुन तेज असे अवतरते
मूर्च्छेत मानवा कर देउनि सावरते
आदर्श कालचा आज जरी लपलेला
तुज पुन्हा पहाया आत्मा आसुसलेला

गुलबर्गा २–१०–१९६९

## माझ्या गृही तिमिर का ?

पसरे प्रकाश भवती
माझ्या गृही तिमिर का ?

आला वसंत राजा
सृष्टी अहा बहरली
माझ्या वनी चिरडिल्या
दैत्ये पदी लता का ?

व्योमी भरारताती
स्वच्छंद पाखरे ना
माझ्याच हस्त पादी
जखडीत शृंखला का ?

होतील बधिर श्रोत्रे
स्वातंत्र्य मोद गाने
आक्रंदने सतींची
ऐकाल या इथे का ?

सोलापूर १९४८

## आमच्या साक्षीने

जीवनाचा अर्थ
एक त्याला समजला होता
ज्यानं केली हाडाची काडं
अवघ्या मानवकल्याणार्थं
रक्ताची कणव
ओघळली मातीत
मातीचा माणूस
उभारण्यासाठी
दुबळे पाय
रोवण्यासाठी
स्वातंत्र्ययज्ञाच्या
कर्मभूमीत !
सर्वेषामविरोधेन
अहिंसा दया सर्वं भूतेषु
मंत्र सामर्थ्याचा !
प्रेमाची ज्योत
निघाली तेजाळून !
होता–हवीर्भाग
दिसतात दोन
असतात एकच
अशी ज्याने दिली
पटवून निज खूण !
खून तर केवळ
निमित्त होता.
घडले खरे–
जीवन यज्ञाचे
एक प्रात्यक्षिक !
'हे राम' मंत्राच्या
उद्घोषात दिलेली
पूर्णाहुती !
आमचे भाग्य
एवढेच की–
आमच्या साक्षीने
घडले हे सारे.
पाहिले आम्ही
तटस्थतेने
हे एक सत्य !

गुलबर्गा २–१०–१९६९

## प्रेरक स्मारक !

व्यक्तित्व पहाडी भव्य डौल खान्दानी
सौजन्य निथळते नसानसामधुनी
ते सदा उमलते मंद स्मित हनुभवती
की चंद्र ईदचा सुखकर क्षितिजावरती

मर्मज्ञ रसिकता मुरलेली नजरेत
समदृष्टी रमली पत्थर आणि फुलात
ते प्रतीक भारत–लोकशाही तत्त्वाचे
ते अजातशत्रू अर्पित जीवन साचे

तो सत्य अहिंसा शांती मानवतेचा
अनुयायी यात्रिक विनयी बापूजींचा
हरपला लाडका पुत्रच भारतभूचा
निखळला दुवा की जुन्या नव्या श्रद्धेचा

जव सुगंध दरवळला त्या व्यक्तित्वाचा
स्वर्गास मोहवी विकास मानव्याचा
की पूर्ण पक्व फल तयात दिसले विधिला
माधुर्य चाखण्या म्हणुनिच खुडिले त्याला

ती विद्या निष्ठा प्रेमहि निज राष्ट्राचे
हो प्रेरक स्मारक सदैव भावी पिढिचे !

गुलबर्गा ९–५–१९६९

  

## जय जवान ! जय किसान !

जय जवान ! जय किसान !
भारतभचे पुत्र महान !
आज उद्याचे तुम्हा आव्हान
देशासाठी लढवा प्राण

काल तुमची उपेक्षा झाली
किंमत खरी आज कळाली
आता कुठे जाग आली
सारी चिंता दूर पळाली

तुम्ही माणसे, आम्ही माणसे
चुकणार तरी नाही कसे
चूकभूल द्यावी घ्यावी
चुकणाराला क्षमा करावी

कंबर आता कसली पाहिजे
जुने पाप जाळले पाहिजे
अंग झाडून उठले पाहिजे
कर्तव्याला जागले पाहिजे

अवघा देश जागला आहे
नुक्ताच उभा राहिला आहे
अजून खूप चालणे आहे
मजल मोठी मारणे आहे

सारे व्हारे सावधान
एकतेचे गाया गान
भेदभाव विसरा सारा
स्वार्थावरती लाथ मारा

गनीमबच्चा दगलबाज
भीक खाऊन चढला माज
युद्धाची त्या सुटली खाज
कोळून प्याला सारी लाज

रात्र गड्या वैऱ्याची आहे
जागणे, जपणे भाग आहे
सीमेवरती आग आहे
घरात दडला नाग आहे

स्वातंत्र्याची किंमत ठाम
रक्त सांडून देणे दाम
आपले काम त्यातच राम
दैव पिकते गाळून घाम

दान कुणाचे घेणे नको
लाचारीचे जिणे नको
आपला हात जगन्नाथ
परकी मदत खोटी बात

किसान खरा ब्रह्मा आहे
त्याच्या करात अन्न आहे
मजूर कामगार चक्रधारी
त्यांच्यामुळेच लक्ष्मी घरी

जवान प्रभू शिव आहे
त्याच्या बाहूत रुद्र आहे
मांगल्याचा तोच तारक
अमंगलाला तोच मारक

तुमच्यामुळे देश आहे
देशात सुखी जीवन आहे
संस्कृतीचा वास आहे
उत्कर्षाचा ध्यास आहे

कोणी करा रक्तदान
कोणी पिकवा शेती छान
तुमच्या हाती सारी शान
राहिली पाहिजे उंच मान

स्वावलंबन एकच तंत्र
स्वातंत्र्याचा एकच मंत्र
जय जवान ! जय किसान !
कोटी कोटी तुम्हा प्रणाम !

गुलबर्गा– १९६५

## लालबहादुर

११ जानेवारी १९६६ ची आतुर सकाळ
ताश्कंदच्या शांतिकराराची शुभवार्ता
ऐकण्यासाठी आतुरल्या कानी
शांतीचा कंदच हरवल्याची होते आकाशवाणी
आणि सुन्न होते मन !
काळ्या अक्षरांची खिळे ठोक 'शांतिदूत कामास आला !'
आम्ही अभागी ! खरेच अभागी !
जवाहर गेला तरी लाल उरला
असेच मानले होते आम्ही.
सार्थ झाले नाव साजेशा कृतीने
आणि आता तोही लाल हरपला !
चर्चा मंथनातून शांतीचे अमृत निघावे ही आशा–
आली परंतु हलाहलासम तुझ्या मृत्यूची दाहक वार्ता.
मृत्यूनेही तू अमर झालास !
आम्ही तुला मुकलो याचे खरे दुःख.
आघातामागून दुसरा आघात !
ऐन आणीबाणीत देशाची धुरा
तुझ्या किरकोळ दिसणाऱ्या खांद्यावर पाहून
हसले होते बडे बळी वामनमूर्तीला
वाटले त्यांना सहज चिरडू या अंगुष्ठ मात्र गणाला
काळा, लाल रंग भारताच्या भवितव्याचा
दिसला कुणाला
घातली झडप बळी-तक्षकांनी !

जागी झाली रुद्रशक्ती ! वामनाचे विराटरूप
तक्षकभक्षक समर्थ नकुल !
लहानातून महान झालेला तू
जनमनाचा मानबिंदू झालास !
आणि यशाच्या शिखरावर अचानक
तळपता तळपता मावळून गेलास !
घुमतो आहे वातावरणात तू दिलेला नवा मंत्र
जय जवान ! जय किसान ! नवी घोषणा–नवी प्ररणा !
जागविली ज्याने आमची सुप्त अस्मिता
हलला अवघा जवान, फुलला सारा किसान !
मंत्र मिळाला द्रष्टा हरवला !
तुझ्या त्वरित निर्णयाचे कौतुक होई म्हणून–
तडकाफडकी निर्णय घेतलास निरोप घेण्याचाही !
निरवानिरवही दक्षतेने केलीस
उरकलेस काम एकूण एक–जाता जाता
आणि आता शांतता कराराची शाई वाळण्यापूर्वीच
उडून गेलास देवदूतासारखा.
काळानेही दिली यशस्वी जीवनाला
विस्मय मृत्यूची सोनेरी झळाली !
शांतियज्ञातील कृतार्थ जीवनाची
एक आहुती ! लालबहादुराची !

गुलबर्गा २२–१–६६

## धन्य मी !

धन्य माय भरतभूमि
धन्य तव कुशीत मी
कूस जिची सुजल सुफल
स्तन्य पुनित गंगाजल
हिमगिरी उत्तुंग भाल
हसत भाग्यलक्ष्मी
राम कृष्ण मुनि महंत
मौला वली साधुसंत
ज्योति तेवती अनंत
कालार्णव कर्दमी
अशोक चक्रवर्ति जेथ
अकबर सम्राट होत
रणप्रताप शिवसमर्थ
वीर बहु पराक्रमी
गार्गी मैत्रेयी किती
विदुषी बहु वीरमती
चन्नम्मा, लक्ष्मी सती
अतुलच संग्रामी

महाकवी नि कलावंत
शास्त्रज्ञहि बुद्धिवंत
कीर्ति होई ज्या दिगंत
ध्वज लहरत व्योमी
हिंदु, मुसलमान, शिख
ख्रिश्चन, ज्यू, पारसिक
वर्ण, धर्म, जाति कैक
ऐक्य पूर्ण संगमी
भव्य जिचा भूतकाल
दिव्य का न भाविकाल ?
वर्तमान कार्यशील
सतत रमे उद्यमी
आशिर्वच देइ माय
मस्तकी तुझेच पाय
झिजो तुझ्याच कार्यि काय
धन्य तरिच धन्य मी !

गुलबर्गा ७–९–१९६६

## राज्य नवे जाहले !

जागली पहा उषा
हासली दिशा दिशा
भाग्य आज जागले
राज्य नवे जाहले

स्वप्न नवे मार्ग नवा
नवी मने मनू नवा
नवेच सर्व निर्मिले
राज्य नवे जाहले

मंद पवनगंधमुदित
निर्झर नव हर्षभरित
पक्षीगण किलबिले
राज्य नवे जाहले

तमा न तमाचीहि आज
पसरले प्रकाश राज्य
गाव गाव जागले
राज्य नवे जाहले

सांधली मने अनेक
एकरूप सर्व लोक
एक भाषी छत्र डुले
राज्य नवे जाहले

कर्तृत्वा बहर येई
बाहूंना स्फुरण देई
योजना विकासशील
राज्य नवे जाहले

आंध्र, मद्र, महाराष्ट्र
केरळ कुसुमात एक
कर्नाटक विकसले
राज्य नवे जाहले

आवाहन तरुणांना
बंधूंना, भगिनींना
शास्त्र–कलावंतांना
करित राज्य पातले

आज जागले किसान
सज्ज जाहले जवान
जनात देव जागले
राज्य नवे जाहले

उठा उठाच हिंदुंनो
मुसलमान बंधुंनो
भिन्न जाति पंथांनो
राज्य नवे जाहले

भेदभाव विसरण्या
ध्येयमार्गं चालण्या
सहकारी सहजीवना
लोकराज्य जाहले

भारत भू माय एक
पुत्र आम्ही जरि अनेक
पांग तिचे फेडण्यास
राज्य नवे जाहले

ज्ञानोदय झोपडीत
मानव्यहि मानवात
रामराज्यनिर्मिण्यास
राज्य नवे जाहले

पूजा निज राष्ट्राची
विश्वबंधु भावाची
सिद्ध आज बांधण्यास
राज्य नवे जाहले !

गुलबर्गा १–११–६६

## सुवर्णभूमी !

ही पहा सुवर्णभूमी, अमृतदेश
सूर्यदेवाच्या प्रथमस्पर्शाने
उजळून निघणारी — पावनभूमी !
उत्तुंग हिमालय देतो जेथे
गंगा यमुनांच्या मुक्तकरांनी
अखंड अर्घ्यदान !
उत्फुल्ल धरित्री सज्ज स्वागतास
क्षितिजापर्यंत पसरलेल्या
हिरव्या पिवळ्या साळीच्या शेतांनी
पायघड्या घालून !
पवित्र पूजा जिथे चालते
क्रांतिप्रकाशाची !
लाभले वरदान दिसे आगळे
काळीच्या पोटी प्रकाशबाळे !
सुजलां सुफलाम् सोनार देश !
मंत्र, तंत्र, साहित्य, संगीत,
नृत्य कलांचा कोमल देश
मानवी संस्कृतीचा पूर्ण चंद्रमा
जिथे वर्षतो शीतल सुधा
सोनार देश ! अमृत देश !
× × × ×
अमृत देश ? छे:
दैव दुभंगला शापित देश !

उगवणारा प्रत्येक सूर्य
जिथे पाहतो रक्ताचा सडा
गळक्या-कुजक्या मांसाचे सारवण
इतस्ततः विखुरलेल्या हाडांची रांगोळी
पुष्ट गिधाडे, कोल्ही-कुत्री
गावेची गावे होमकुंडागत पेटतात
निष्पाप बाळे बळी दिली जातात
नरपशू जेथे नरांची नरडी घोटून
उडवतात रक्ताची कारंजी !
आणि माद्यांना भोगून
नागड्या रस्त्यात
पाशवी वासनांची
रग जिरवितात—विषारी सर्प !
क्रूर सैतानांचा नंगा नाच !
भयाने भूतकाळाचा गर्भपात
होऊन जन्मले नादिर चंगेज !
कंगाला हाती सोनार बंगाल !
पुन्हा एकदा सत्य नागवते
देशोधडी लागते !
सुवर्ण—रक्ताचे अतूट नाते
इतिहासाच्या पानोपानी चितारलेले
परंतु कोणा वेड्यापिश्यांनी
पुनः पुन्हा पुसू पाहिलेले !
होते सोन्याची माती—माती
रक्ततमलांच्छित माती !

मातीचे मोल नुरले मानवा !
कोसळते तशात अस्मानी सुल्तानी
निसर्गप्रकोप, वादळवारी
पूर भयानक, लक्षांचा संहार !
झुंडीच्या झुंडी मनुष्यप्राण्यांच्या
फुटत्या वारुळातून पांगतात
भकास डोळ्यांनी शोधीत वाहातात
पाहात अंधारात लागतो कुठे का
आधार–किनारा–बुडत्या
भविष्याचा !

× × × ×

पतित कोण, शाप कुणाला ?
असह्य, अश्रूत क्रौर्य विनाशक
मानवातला जागला दानव
ऊठ कालीमाते टाकून निद्रा
झाडून खड्गा, प्रकटवी तव
दिव्य प्रलयमुद्रा !
संहरी भद्रे त्वरे अभद्रा !

गुलबर्गा ११–१०–७१

## दुरिताचे तम जावो !

झालो स्वतंत्र स्व–तंत्र
प्रत्येकाचे न्यारे तंत्र
कोणाला ना ताळतंत्र
हरवला मूळमंत्र !

साधुसंतांच्या जगती
संधिसाधूंची भरती
विद्या प्रतिष्ठा नी प्रीती
काळ्या बाजारी हिंडती

असत्याची सोय खाशी
मागे पुढे दास दासी
सत्य तिष्ठते उपाशी
सत्तेचिया दारापाशी

बोले तैसा जो का चाले
त्याची खुंटती पाऊले
भले बैल जुंपलेले
अडाण्याचा गाडा चाले

दाम करी जेथे काम
पाषाणासी फुटे घाम
कोणी पुसेना सुशीला
जेथे चालतो वशीला

मूठ दाबताच झुले
कळसूत्राचे बाहुले
नशीबाचे दार खुले
सुभाषित हेच झाले

शितासाठी भांडाभांड
झाली लेकुरे उदंड
जशी पाप्याची पितरे
झाले जन्माचे मातेरे

भाषा भगिनींची कथा
झाली व्यथेचीच गाथा
उगा भडकावा माथा
शेजाऱ्याला हाणी लाथा

नको एकी बरी बेकी
सदा चालू वजाबाकी
भाग भागता भागले
मागे झाले, पुढे चाले

चढा भाव सुटे हाव
जिण्यासाठी धावाधाव
गुंडा गर्दी नी घेराव
आता नित्याचा सराव

  

व्हावा वाल्याचा वाल्मिकी
परंपरा ऐशी थोर
गति उलटी दिसे की
होई नराचा वानर !

आता तरी यावी जाण
जाळुनिया जुनी घाण
व्हावी सत्त्वाची लावण
फुलतील नवे प्राण !

तारु वादळी बुडता
नाही काय कोणी त्राता
थोर महात्म्यांची माता
काय वांझ झाली आता ?

अजुनही नाही वाण
येथे भरलेली खाण
आच लागताच हीण
जळे, उरेल सुवर्ण !

काळगर्भात सविता
जन्मे दिशा उजळता
भाग्योदय पुन्हा होवो
दुरिताचे तम जावो !

गुलबर्गा ८–१०–६७

कृतज्ञता–

एका पहाटे
कळीचे एका
फूल झाले,
स्वानंदाच्या
सुगंधाने
डुलू लागले
झुलू लागले.

डुलता झुलता
आठवणींनी–
मातीखालच्या
मुळ्यांसाठी–
डोळे त्याचे
दवबिंदूंनी
भरून आले !

गुलबर्गा २५–११–७५



**श्री. चंद्रशेखर कपाळे**
एम. ए.

मराठी विभाग प्रमुख
शासकीय महाविद्यालय,
गुलबर्गा-२ (कर्नाटक).

१९४८ ते १९७५ या काळात कवी चंद्रशेखर कपाळे हे कसे जिवंत व रसरशीतपणे जगत होते, जागे होते याची ही (गंधवती) एक साक्ष आहे–

गंध हा पृथ्वीचा गुण आहे. चंद्रशेखरांच्या कवितेला गंधाने चांगलेच माखले आहे. भरघोस गंध आहे. काही एकांतातला आहे काही लोकांतातला आहे. नसत्या संतपणापेक्षा जिवंत संथपणा कवीच्या शब्दार्थाशी एकरूप झालेला आहे. त्यामुळे ते चुटकेच लिहोत अथवा दीर्घकाव्य करोत त्याचा संथ प्रवाह 'खडका'लाही जुमानत नाही.

**पद्मश्री डॉ. द. रा. बेंद्रे**



**मूल्य पाच रुपये**